राज्यातील कृषि विद्यापीठांना सेंद्रिय शेती संशोधन व प्रशिक्षण केंद्र या प्रकल्पासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात कार्यक्रमांतर्गत लेखाशीर्षाखाली निधी वितरीत करण्याबाबत.

लेखाशीर्ष - २४१५ ००७२, २४१५ ००८१, २४१५ ०१०५

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : कृषिवि-३७२१/प्र.क्र.१४७/७अे,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २३ फेब्रुवारी, २०२२.

**संदर्भ :-** १. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. कृषिवि-३७१६/प्र.क्र.४८/८-अे, दि.२३.०८.२०१७.
२. महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांचे पत्र क्र. जा.क्र.लेखा/सेंद्रिय शेती/ २९३/सन २०२१, दि.१४.०९.२०२१.
३. डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली यांचे पत्र क्र.जा.क्र. डॉबासाकोकृवि/लेखा-२/८७४/२०२१, दि.१८.१०.२०२१.
४. वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी यांचे पत्र क्र.जा.क्र.सिएफबी/ ३२००/२१, दि.२७.१०.२०२१.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र शासनाचा सन २०१६-२०१७ या वर्षाचा अर्थसंकल्प विधानसभेला सादर करताना मा. वित्त मंत्री यांनी केलेल्या भाषणात चारही कृषी विद्यापीठात स्वतंत्र "सेंद्रीय शेती संशोधन व प्रशिक्षण केंद्र" स्थापन करण्यात येईल अशी घोषणा केली आहे. या अनुषंगाने राज्यातील चारही कृषि विद्यापीठांतर्गत स्वतंत्र सेंद्रिय शेती व प्रशिक्षण केंद्र स्थापन करण्याकरिता आवर्ती व अनावर्ती खर्चासाठी प्रत्येक विद्यापीठाला रु.५ कोटी प्रमाणे एकूण रु.२० कोटी इतक्या प्रकल्प खर्चास उपरोक्त संदर्भ १ येथील दि.२३.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार सदर प्रकल्पासाठी निधी वितरीत करण्याची विनंती उपरोक्त संदर्भ क्र.२ ते ४ येथील पत्रान्वये करण्यात आली आहे. सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विच्याराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील कृषि विद्यापीठांना सेंद्रिय शेती संशोधन व प्रशिक्षण केंद्र या प्रकल्पासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात लेखाशीर्ष २४१५ ००७२, २४१५ ००८१, २४१५ ०१०५ (कार्यक्रम) अंतर्गत ३१-सहाय्यक अनुदाने करीता रु.२,४६,७१,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी सेहेचाळीस लाख एकाहत्तर हजार फक्त) व ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीसाठी रु.१,८८,३२,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी अठ्ठ्याऐंशी लाख बत्तीस हजार फक्त) असे एकूण रु.४,३५,०३,०००/- (अक्षरी रुपये चार कोटी पस्तीस लाख तीन हजार फक्त) इतका निधी वितरणास पुढीलप्रमाणे मंजूरी देण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| अ.क्र. | विद्यापीठ व लेखाशीर्ष | लेखाशीर्ष | अर्थसंकल्पीत निधी | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी (२४१५००७२) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) | २००.०० | १००.०० |
| २ | | ३५- भांडवली मत्तेच्या निर्मितीसाठी | ३३००.०० | ४४.४९ |
| ३ | डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली (२४१५००८१) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) | ३००.०० | ३८.५० |
| ४ | | ३५- भांडवली मत्तेच्या निर्मितीसाठी | १५००.०० | २६.०० |
| ५ | वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी (२४१५०१०५) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) | ३००.०० | १०८.२१ |
| ६ | | ३५- भांडवली मत्तेच्या निर्मितीसाठी | २०००.०० | ११७.८३ |
| | एकूण - | ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) | | २४६.७१ |
| | | ३५- भांडवली मत्तेच्या निर्मितीसाठी | | १८८.३२ |

**एकूण रु.४३५.०३**

**अटी व शर्ती**

१) कृषि विद्यापीठांनी उपलेखाशिर्ष / गट / योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील जी पदे / बाबी, योजनेतर योजना म्हणून पुढे चालू ठेवण्यास शासनाने मान्यता दिली आहे, त्या पदांचे वेतन व भत्ते आणि अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा. काही पदे रिक्त असल्यामुळे अथवा अन्य बाबी / कारणांमुळे एखाद्या योजनेखाली अनुदान अखर्चित राहील्यास, सदर अनुदान पुढील महिन्यामध्ये वितरीत करण्यात येणा-या अनुदानामध्ये समायोजित करावे.

२) उपलेखाशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

३) उपलेखाशिर्षनिहाय मंजूर योजनांचे व त्या अंतर्गत मंजूर असलेल्या पदांचे सुधारित आकृतीबंधानुसार व्यवस्थितरित्या गटनिहाय वर्गीकरण केले आहे किंवा कसे याची विद्यापीठाने सखोल तपासणी करावी. सदर वर्गीकरणामध्ये शासनाच्या मान्यतेशिवाय कोणतेही बदल करु नयेत.

४) प्रत्येक गटामधील वितरीत केलेले सहाय्यक अन महसूली उत्पन्न त्या गटातील अनुज्ञेय बाबींवरील खर्च भागविण्यासाठी आणि विकास कामे करण्यासाठी उपयोगात आणावे. एका गटाचे सहायक अनुदान आणि महसूली

उत्पन्न दुस-या गटातील योजनां / बाबींसाठी वर्ग करु नये. एखाद्या गटातील योजनेसाठी जास्त सहायक अनुदान वितरीत झाले असेल तर, पुढील निधीची मागणी करताना सदर जास्तीचे अनुदान विचारात घेऊन तेवढ्या कमी व अनुज्ञेय निधीची मागणी करावी.

५) शासनाने मंजूर केलेल्या पदांपैकी जी पदे महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३ आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९० मधील तरतूदीप्रमाणे भरलेली आहेत व सदर पदे योजनेतर खर्चाने पुढे चालू ठेवण्यासाठी शासनाने मान्यता दिली आहे, अशा पदांच्या वेतन व भत्त्यांसाठीच विहीत अनुदान देय राहील.

६) प्रत्येक उपलेखाशीर्ष / गट/योजना आणि बाब निहाय स्वतंत्र लेखे / हिशोब ठेवावेत.

७) ज्या योजनांतर्गत / योजनेतर योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधित कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनेतर/योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेऊ नयेत.

८) कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

९) शासनाने विद्यापीठाच्या काही नवीन योजनांना मान्यता देताना, सदर योजनेमधील पदे अंतर्गत समायोजनाने उपलब्ध करण्यास/भरण्यास मान्यता दिलेली आहे. यामुळे सदर नवीन योजनेसाठी नवीन पदे निर्माण झाल्यामुळे, ज्या योजनेतर / योजनांतर्गत मूळ योजनांमधील पदे अंतर्गत समायोजनाने नवीन योजनेकरिता वर्ग / उपलब्ध केली असतील, त्या मूळ योजनांमधील पदांचे वेतन व भत्यासाठी या आदेशान्वये वितरीत केलेला निधी खर्च करु नये. तसेच तिमाही अनुदानाची मागणी करताना, अशा पदांचे वेतन व भत्यासाठी लागणा-या निधीची मागणी करु नये.

१०) कृषि विद्यापीठांना त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

११) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

१२) सन २०२१-२२ मधील अनुदानाची मागणी करताना, विद्यापीठाने दरमहा १० तारखेपर्यंत योजनानिहाय वितरीत केलेले अनुदान, प्रत्यक्ष खर्च आणि शिल्लक अनुदान याबाबतचा अहवाल सादर करावा. यापुढे अनुदानाची मागणी सादर करताना, पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानातील शिल्लकीची प्रस्तावित मागणीशी सांगड घालून, प्रत्यक्षात आवश्यक तेवढ्याच अनुदानाची मागणी करण्यात यावी.

१३) नियमबाह्य योजना पदे आणि बाबींसाठी खर्च करु नये.

२. विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

३. उपविभागीय कृषि अधिकारी, राहुरी, उपविभागीय कृषि अधिकारी, दापोली व उपविभागीय कृषि अधिकारी, परभणी या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान शासन निर्णय क्रमांक कृषि व सहकार विभाग क्रमांक अेजीयु-१०७२/१८४७१/व्ही, दिनांक २७ सप्टेंबर,१९७२ आणि शासन निर्णय क्रमांक कृषिवि- २००३/सीआर-३५/२०-अे, दिनांक २५/४/२००३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कृषि विद्यापीठांचे नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

४. या प्रित्यर्थचा खर्च सन २०२१-२२ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. सदरचा शासन निर्णय हा, नियोजन विभागाचा अनौ.संदर्भ क्र.३९८/१४३१, दि.१३.१२.२०२१ व वित्त विभागाचा अनौ.संदर्भ क्र.०७/२०२२/व्यय-१,दि.०६.०१.२०२२ सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०२२३१४०६५१०००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VARSHA M MEHER

Digitally signed by VARSHA M MEHER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=15c7ee448037873e9a798068206bca7a76131bdca6b4660721edcffa24f13d02, pseudonym=DF028EC074B9701EF79AA9C9DDE9252E3743EE7A, serialNumber=32E5D5F3AC71BC2B5E34B484CA757B21FC3E12CE30CAE2D0F913FE77E2B06737, cn=VARSHA M MEHER
Date: 2022.02.23 15:20:26 +05'30'

**( वर्षा मेहेर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. सदस्य सचिव तथा महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
२. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक/ संचालक (संशोधन), महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली व वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी,
३. उपविभागीय कृषि अधिकारी, राहुरी, जिल्हा अहमदनगर,
४. उपविभागीय कृषि अधिकारी, दापोली, जिल्हा रत्नागिरी,
५. उपविभागीय कृषि अधिकारी, परभणी जिल्हा परभणी,
६. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
७. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर, रत्नागिरी, परभणी,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
९. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१०. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
११. वित्त विभाग (व्यय १/ बियुडी १३), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१२. नियोजन विभाग (कार्यासन १४३१), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१३. कक्ष अधिकारी/ अवर सचिव, कार्यासन २अे / ६अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१४. कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.